प्रधानमंत्री मत्स्यसंपदा योजनेंतर्गत कृत्रिम रीफ राज्यामध्ये प्रभावीपणे राबविण्यासाठी आयुक्त (मत्स्यव्यवसाय) यांच्या अध्यक्षतेखाली तांत्रिक समिती गठित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-११२२/प्र.क्र. २१४ (भाग-१)/पदुम-१४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ एप्रिल, २०२३

वाचा - १) केंद्र शासनाचे पत्र क्र. j-०१०१२/८/२०२३-Fy, दिनांक १७ फेब्रुवारी, २०२३
२) आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र. मत्स्य/सा/०५३१०१/१४०८/२०२२, दिनांक ०९ मार्च, २०२३.

**प्रस्तावना -**

लहान मच्छिमारांचे उत्पन्न वाढविणे व मत्स्य पुनरूत्पादन करण्याच्या दृष्टीने केंद्र शासनाने PMMSY अंतर्गत नवीन उपघटक "Promotion of sustainable fisheries and Livelihoods through Artificial reefs and/or Sea ranching" कार्यक्रम सुरू केला आहे. केंद्र शासनाचे सचिव (मत्स्य), नवी दिल्ली यांचे पत्र दि. १०/१०/२०२२ अन्वये महाराष्ट्र राज्याकरिता प्रधानमंत्री मत्स्य संपदा योजनेअंतर्गत केंद्र पुरस्कृत योजनेच्या लाभार्थी नसलेल्या घटकामध्ये १८२ कृत्रिम रिफ स्थापित करणेबाबतचे उद्दिष्ट प्रस्तावित केलेले आहे. महाराष्ट्र राज्याच्या किनारपट्टीलगत १८२ कृत्रिम रिफ प्रकल्प उभारणीकरिता रु. ३१.०० लक्ष प्रती रिफप्रमाणे, रु. ५६४२.०० लक्ष इतक्या निधीच्या प्रस्तावास केंद्र शासनाने वाचा १) येथील पत्रान्वये प्रशासकीय मान्यता दिलेली आहे. तसेच केंद्र शासनाने दि. २९.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये रु. ८४५.०० लक्ष इतका निधी राज्य शासनास वितरीत केला आहे. सबब राज्याच्या सागरी किनारपट्टीवर सदर प्रकल्प यशस्वीपणे व योग्य पद्धत्तीने राबविण्याकरिता आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली एक तांत्रिक समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्याच्या सागरी किनारपट्टीवर कृत्रिम रीफ (Artificial Reef) यशस्वीपणे व योग्य पद्धत्तीने राबविण्याकरिता आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे तांत्रिक समिती गठित करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | वरीष्ठ वैज्ञानिक, केंद्रिय सागरी मत्स्यकी अनुसंधान संस्था, मुंबई | सदस्य |
| ३ | वैज्ञानिक, फिशरीज सर्वे ऑफ इंडिया, मुंबई | सदस्य |
| ४ | वैज्ञानिक, नॅशनल इन्स्टिटट्यूट ऑफ ओशियन टेक्नॉलॉजी, मुंबई | सदस्य |
| ५ | सहआयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ६ | प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग, मुंबई | सदस्य |
| ७ | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), मुंबई | सदस्य सचिव |

२. सदर समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

I. कृत्रिम रिफ स्थापनेकरिता उपयुक्त असलेल्या समुद्रातील १८२ ठिकाणाची (तांत्रिक संस्थेमार्फत) निवड करणे, त्याचे आक्षांश-रेखांश प्राप्त करुन घेणे, कृत्रिम रीफ युनिट स्थापनेची प्रक्रियेचे आयोजन व व्यवस्थापन करणे इत्यादी.

II. कृत्रिम रिफ योजना राज्याच्या किनारपट्टीवर प्रभावीपणे राबविण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

III. कृत्रिम रिफ बनविण्यासाठी वापरात आणावयाचे साहित्य तसेच कृत्रिम रिफचा आकार याबाबत मार्गदर्शन करणे .

IV. कृत्रिम रिफसाठी प्रचलीत शासन निर्णयानुसार निविदा प्रक्रिया करणे, पुरवठादार /कंत्राटदार निश्चित करणे, मंजूर केलेली कामे समाधानकारकरित्या पूर्ण केल्याची खात्री करणे, व कामांची देयके संबंधितांस अदा करण्यासाठी शिफारस करणे.

V. वेळोवेळी आवश्यक बाबींकरिता तांत्रिक व शास्त्रिय दृष्ट्या मार्गदर्शन करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४१९१५३७३८८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANJAY JAGANNATH SAVANE

Digitally signed by SANJAY JAGANNATH SAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eecf658e3610fa137d1ea1fd3304d639f1d5384d08303b49875a1fb41cb9c5b8, pseudonym=BE10EB938AF079487419C9BFE07F030E4670A798, serialNumber=86F57086A2BEEC37477C2F6210FB8A27626CA243A845EA1A73F70CF31BE98102, cn=SANJAY JAGANNATH SAVANE
Date: 2023.04.19 15:43:54 +05'30'

**( सं. ज. सवने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सह आयुक्त (सागरी), मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई विभाग, मुंबई.
९. कार्यकारी अभियंता, आयुक्त (मत्स्य) यांचे कार्यालय, मुंबई.
१०. वरीष्ठ वैज्ञानिक, केंद्रिय सागरी मत्स्यकी अनुसंधान संस्था, मुंबई.
११. वैज्ञानिक, फिशरीज सर्वे ऑफ इंडिया, मुंबई
१२. वैज्ञानिक, नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ ओशियन टेक्नॉलॉजी, मुंबई
१३. संचालक, केंद्रीय मत्स्यकी तटवर्ती अभियांत्रिकी संस्था (CICEF under Ministry of ADF, GoI)
१४. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (सागरी), मुंबई
१५.निवडनस्ती.